**मोटार वाहनचालक प्रशिक्षण योजना**
**<u>एजन्सी नियुक्ती रद्द करणेबाबत</u>**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक - मोवाप्र २०१०/प्र.क्र.२५३/मावक-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १९ नोव्हेंबर, २०१०

**वाचा-** १) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक मोवाप्र २००५/प्र.क्र.१४/मावक-२, दिनांक ४ फेब्रुवारी, २००८
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-विजाभ-२००८/प्र.क्र.२१३/मावक-३, दि.२३ जुलै, २००९

**<u>शासन निर्णय :-</u>** मागासवर्गीय विद्यार्थ्यांना मोटार वाहन चालक प्रशिक्षण देण्याच्या योजनेकरीता शासन निर्णय दि.४.२.२००८ व दि.२३.७.२००९ अन्वये राज्यातील सर्व जिल्ह्याकरीता मे.रमेश मोटार ड्रायव्हींग स्कूल जळगांव या संस्थेची शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत नियुक्ती करण्यात आलेली होती. सदरहू योजना जिल्हास्तरावर राबवावयाची असल्यामुळे मे.रमेश मोटार ड्रायव्हींग स्कूल जळगांव या संस्थेची नियुक्ती या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहे. सदरहू आदेश तात्काळ अंमलात येतील. मात्र या संस्थेकडे सध्या जे विद्यार्थी प्रशिक्षण घेत आहेत, त्या विद्यार्थ्यांचे प्रशिक्षण पूर्ण करण्यात यावे. यापुढे उक्त संस्थेस नवीन विद्यार्थ्यांची यादी देण्यात येऊ नये.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक क्रमांक २०१०१११९१६४२०५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(उ.शि.लोणारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, वि.जा.भ.ज.संचालनालय, पुणे.
प्रधान सचिव (सामाजिक न्याय), यांचे स्वीय सहाय्यक
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी,

सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद,
सर्व महामंडळाचे व्यवस्थापकीय संचालक
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा), मुंबई /नागपूर.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
उप सचिव (अर्थसंकल्प), सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय ,मुंबई
कक्ष अधिकारी (विघयो-१), सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (मावक-३), सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अधिकारी (संगणक कक्ष), सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई. (शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्दीकरीता)
मे.रमेश मोटार ड्रायव्हींग प्रशिक्षण संस्था, ४३/४३, खानदेश मिल कॉम्प्लेक्स, जळगाव.
निवड नस्ती, मावक -२